**तात्पुरत्या स्वरुपात दोन वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी नेमणूक केलेल्या पोलीस पाटलांना नियुक्तीसाठी प्राधान्य देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र. बीव्हीपी-०८०९/प्र.क्र.२३१/पोल-८
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१०.

पहावे : १) महाराष्ट्र ग्राम पोलीस पाटील (सेवा प्रवेश, पगार भत्ते आणि सेवेच्या इतर शर्ती) आदेश, १९६८.
२) शासन परिपत्रक क्र. बीव्हीपी ०२९९/सीआर-३१/पोल-८, दिनांक ७.१०.१९९९.
३) शासन निर्णय क्र. बीव्हीपी-०५१०/प्र.क्र.२०१/ पोल-८, दिनांक १४.६.२०१०

शासन निर्णय

प्रस्तावना :- महाराष्ट्र ग्राम पोलीस पाटील (सेवा प्रवेश, पगार भत्ते आणि सेवेच्या इतर शर्ती) आदेश, १९६८ मधील नियम ४ नुसार पोलीस पाटलाची ५ वर्षांसाठी प्रथमतः नियुक्ती केली जाते व त्याचे काम समाधानकारक आढळल्यास पुढील १० वर्षांसाठी त्यास मुदतवाढ दिली जाते. तसेच. महाराष्ट्र ग्राम पोलीस पाटील (सेवा प्रवेश, पगार भत्ते आणि सेवेच्या इतर शर्ती ) आदेश, १९६८ मधील नियम ६ नुसार निलंबित केल्यामुळे, रजेवर असल्यामुळे किंवा इतर कोणत्याही कारणामुळे पोलीस पाटलाचे पद तात्पुरते रिकामे झाल्यास पोलीस पाटलाची कर्तव्ये पार पाडण्यास पात्र असलेल्या एखाद्या व्यक्तीची तात्पुरती नियुक्ती केली जाते. अशी तात्पुरती नियुक्ती देऊन २ वर्षापेक्षा जास्त कालावधीकरिता पोलीस पाटील पदावर काम केलेल्या उमेदवारांना पोलीस पाटील पदावरील नियुक्तीसाठी प्राधान्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :- वरील बाबींचा सर्वांगिण विचार करुन शासन आता असे आदेश देत आहे की, पोलीस पाटील पदे भरण्यासाठी विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार सध्या ठरविण्यात आलेल्या आरक्षणामध्ये, तात्पुरत्या स्वरुपात दोन वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी कार्यरत पोलीस पाटील बसत असल्यास, तसेच पोलीस पाटील पदासाठी विहित केलेल्या इतर अटींची पूर्तता करुन त्यास प्रथम क्रमांकाच्या उमेदवाराइतके गुण मिळाले असल्यास त्यास पोलीस पाटील पदावरील नियुक्तीकरिता प्राधान्य देण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शहाजहान मुलाणी )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व उपविभागीय अधिकारी, (जिल्हाधिकारी यांच्यामार्फत)
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधिक्षक
निवडनस्ती (पोल-८)

ROTA | M 2253 (30-8-2010)
G:\११\Tatpurate po.pt. Solapur.lwp\२३